**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२

मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख: २१ एप्रिल, २०१५.

**वाचा :-**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का-१३, दि.२८.०८.२००९.

२) मा.मुख्यमंत्री महोदयांनी आदिवासी विकास विभागाच्या संदर्भात घेतलेल्या दि.२३.०२.२०१५ रोजीच्या आढावा बैठकीतील कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-**

मा.मुख्यमंत्री महोदयांनी आदिवासी विकास विभागाच्या संदर्भात झालेल्या दि.२३.०२.२०१५ रोजीच्या आढावा बैठकीत "आदिवासी विकास विभागामार्फत नामांकित शाळांमध्ये दरवर्षी पाठविण्यात येत असलेल्या २५०० विद्यार्थ्यांच्या संख्येत १० पटीत वाढ करण्यात यावी." असा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळेत प्रवेश देणे या योजनेंतर्गत संदर्भाधिन दि.२८.०८.२००९ च्या शासन निर्णयानुसार निश्चित केलेला विद्यार्थ्यांचा लक्षांक २५०० वरून २५००० करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

(१) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळेत शिक्षण देणे या योजनेंतर्गत विद्यार्थ्यांचा लक्षांक वाढवून २५००० इतका करण्यात येत आहे.

(२) सदर योजनेंतर्गत विद्यार्थ्यांना यापुढे इ. १ ली व ५ वी या दोन टप्प्यावर प्रवेश देण्यात येईल.

(३) नामांकित शाळांची खालीलप्रमाणे वर्गवारी करून शुल्क निश्चित करण्यात येत आहे :-

i. महानगरपालिका कार्यक्षेत्रातील शाळा रू.५०,०००/-

ii. जिल्हास्तरीय मुख्यालय कार्यक्षेत्रातील शाळा रू.४५,०००/-

iii. तालुकास्तरावरील / नगरपालिका क्षेत्रातील (जिल्हा मुख्यालय वगळून) व अन्य शाळा रू.४०,०००/-

iv. महाबळेश्वर, पाचगणी, चिखलदरा, पन्हाळा, लोणावळा या थंड हवेच्या ठिकाणच्या शाळा रू.५०,०००/-

(४) सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून सदर बदल अंमलात येतील.

(५) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षाकरिता वर्तमानपत्रात व अन्य प्रकारे जाहीरात देऊन, योजनेचा प्रचार व प्रसार करून नामांकित शाळांकडून इयत्ता १ ली व ५ वी च्या प्रवेशासाठी प्रस्ताव मागवावेत.

(६) शैक्षणिक वर्ष २०१५-१६ सुरू होण्यास फारच कमी कालावधी शिल्लक असल्याने शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वी नामांकित शाळांच्या निवडीची कार्यवाही होणे अपेक्षित आहे. सबब, वर्तमानपत्रात जाहिरात देणे, शाळांची तपासणी इ. कार्यवाही त्वरीत करून प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर करण्यात यावा.

(७) योजनेचा लक्षांक पूर्ण करण्यासाठी जास्तीत जास्त विद्यार्थी निवडण्याची कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची राहील. यासाठी प्रत्येक प्रकल्प अधिकारी यांना किमान १००० विद्यार्थी निवडीचे उद्दीष्ट देण्यात येत आहे.

(८) सदर योजनेत उपरोक्त परिच्छेद क्र. १, २, ३ व ७ मधील सुधारणा वगळता शासन निर्णय दि.२८.०८.२००९ मधील इतर तरतूदी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२२१५५२२८२४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.04.22 16:07:29 +05'30'

**सु.ना.शिंदे**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखापरिक्षा / महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.

९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१०) सर्व जिल्हाधिकारी.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) अधिदान व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / प्रशासकीय भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई.
१३) सर्व उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
१५) सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी मंत्रालय, मुंबई-३२.
१६) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१७) सर्व संबंधित संस्था / शाळा मार्फत संबंधित प्रकल्प अधिकारी.
१८) निवड नस्ती, का-१२.